आर्थिक वर्ष सन २०१८-१९ साठी महनिर्मिती कंपनीच्या भुसावळ १x६६० मे. वॅ. प्रकल्पासाठी मंजूर असलेले भागभांडवल वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**ऊद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्र. निधिवि-२०१९/प्र.क.४/ऊर्जा-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ०१ फेब्रुवारी, २०१९

**संदर्भ** :- १. शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र. प्रकल्प-२०१०/प्र.क्र.३/उर्जा-४ दिनांक ५.१०.२०१०
२. शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि. ०२.०४.२०१८
३. महानिर्मितीचे पत्र क्र.CMD/MSPGCL/No.१४५५७ दि.२०.१२.२०१८

**प्रस्तावना** :-

भुसावळ औष्णिक बदली प्रकल्पास संदर्भिय शासन निर्णय क्र. १ अन्वये शासनाने मान्यता दिली आहे. सदर प्रकल्पाचा एकूण खर्च रु. ४२९० कोटी इतका असून त्यापैकी २०% शासनाचे भागभांडवल म्हणून रु. ८५८ कोटी इतक्या रक्कमेस उपरोक्त शासन निर्णयान्वये शासन मंजूरी देण्यात आली आहे. त्यापैकी आजतागायत रु. ४३.३५ कोटी इतके भागभांडवल महानिर्मिती कंपनीस माहे मार्च, २०१८ अखेर पर्यंत वितरीत करण्यात आले आहे.

२. महानिर्मिती कंपनीने त्यांचे संदर्भिय पत्र क्र. ३ अन्वये सन २०१८-१९ करिता भुसावळ औष्णिक विद्युत प्रकल्पासाठी अर्थसंकल्पित करण्यात आलेली रक्कम रु. ४३.२० कोटी वितरीत करण्याची शासनास विनंती केली आहे.

३. वित्त विभागाच्या संदर्भिय परिपत्रक क्र. २ अन्वये कार्यक्रम खर्चावरील अर्थसंकल्पित निधीच्या ७०% रक्कम वितरीत करण्याचे अधिकार प्रशासकीय विभागास देण्यात आले आहेत. त्यास अनुसरुन रु. ३०.२४ कोटी शासनाचे भागभांडवल म्हणून महानिर्मिती कंपनीस वितरीत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय** :-

भुसावळ औष्णिक विद्युत प्रकल्पाच्या बदली प्रकल्पाचे नूतनीकरण व आधुनिकीकरण करण्यासाठी राज्य शासनाची भांडवली गुंतवणुक रू. ३०,२४,००,०००/- (रु.तीस कोटी चोवीस लाख फक्त) इतकी रक्कम महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी मर्यादेत यांना वितरीत करण्यास या शासन निर्णयाव्दारे मंजूरी देण्यात येत आहे.

२. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या भागभांडवलाची रक्कम ज्या कारणासाठी मंजूर करण्यात आलेली आहे त्याच कारणासाठी उपयोगात आणली जाईल याची खातरजमा करावी.

३. वरील बाबीचा खर्च “मागणी क्र.के-११ मुख्यलेखाशिर्ष ४८०१ वीज प्रकल्पावरील भांडवली खर्च ०२ औष्णिक विद्युत निर्मिती,१९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका,

(००) (०३) भुसावळ औष्णिक विद्युत प्रकल्पाच्या बदली प्रकल्पामध्ये भांडवली गुंतवणुक (४८०१३७३१) ५४ गुंतणुक" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा.

४. सदर रक्कम अधिदान व लेखाधिकारी यांच्यामार्फत कोषागारातून काढून महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी मर्यादित, मुंबई यांना अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून अवर सचिव (ऊर्जा-३) व नियंत्रण अधिकारी म्हणून सह सचिव (ऊर्जा-३) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. त्यांना मंजूर झालेली रक्कम रू. ३०,२४,००,०००/- (रूपये तीस कोटी चोवीस लाख फक्त) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई येथून महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी यांच्या नावे स्वतंत्ररित्या धनादेश काढून वितरीत करण्याची कार्यवाही करावी.

५. वित विभागाच्या दिनांक ०२.०४.२०१८ च्या परिपत्रकातील परिच्छेद क्रमांक-२ ते ८ मधील अटी लागू होत नसल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे. परिपत्रकाच्या सोबतच्या परिशिष्टातील अ.क्र.१ ते ७ च्या अटी लागू होत नाही. अ.क्र.८ मधील ५४ गुंतवणुका च्या अनुषंगाने तपासणी सूचीतील अट क्रमांक १ व ३ या अटींची पूर्तता होत आहे. उर्वरित अटी लागू होत नाही.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०१९०२०२१५३९३३८३१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Nitin Gaikwad

Digitally signed by Nitin Gaikwad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry Energy and Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5892c3fd8686c1921e784a3faa9888d155b03f5591ce11b21a1b5006247f6972, serialNumber=2276ac762af372d872c2f01d5bb5086166f4a6e20a1bdf9762d556a93f5d118e, cn=Nitin Gaikwad
Date: 2019.02.02 15:41:23 +05'30'

**( नितीन गायकवाड )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत:-**

१) अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ सूत्रधार कंपनी मर्यादित, हॉंगकॉंग बॅंक बिल्डिंग, फोर्ट, मुंबई.
२) अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी मर्यादित, प्रकाशगड, वांद्रे, (पूर्व), मुंबई-५१
३) मा. विरोधी पक्ष नेता, विधानपरिषद / विधानसभा, विधान भवन, मुंबई
४) महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई-४०००२०.
५) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई-४०००२०.
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
७) अधिदान व लेखा अधिकारी, अराप / रालेवि-१), मुंबई.
८) अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
९) निवासी लेखा अधिकारी, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०००५१.
१०) कक्ष अधिकारी (रोखशाखा) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११) क.अ.अधिकारी (प्रशा-१), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१२) वित्त विभाग, (अर्थसंकल्प-१४ / साधनसंपत्ती / साऊ / व्यय-१६) मंत्रालय, मुंबई-३२.
१३) निवडनस्ती (ऊर्जा-३), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.